राज्य शासनाच्या वेब साईटचे व्यवस्थापन करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक :सीओएम-१०९९/प्र.क्र. २७६/९९/३९

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २५ जानेवारी २०००

<u>प्रस्तावना</u> :-

राज्य शासनाच्या कामकाजाचे सर्वांगीण संगणकीकरण करण्याचा कार्यक्रम शासनाने हाती घेतला असून या कार्यक्रमांतर्गत वेगवेगळया विभागांचे प्रकल्प आतापर्यन्त मंजूर करण्यात आलेले आहेत. शासकीय कामकाजाचे संगणकीकरण झाल्यानंतर हया आधुनिकीकरणाचा जनतेला उपयोग होण्यासाठी शासकीय सेवा जनतेपर्यन्त सुलभपणे पोहोचणे आवश्यक आहे. जनतेपर्यंत शासकीय सेवा इलेक्ट्रॉनिक माध्यमातून पोहोचवावयाची असेल तर त्यासाठी इंटरनेट हे अतिशय प्रभावी साधन उपलब्ध आहे. सबब इंटरनेटचा वापर करुन शासकीय सेवा जनतेपर्यंत पोहोचविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. इंटरनेटच्या माध्यमातून शासनाचे विविध कार्यक्रम, सुविधा व सवलती याची माहिती जनतेपर्यन्त पोहोचवावयाची असेल तर विविध विभागांना त्या विभागांतर्गत चालू असलेल्या योजना व त्यांची अंमलबजावणी याबाबत इंटरनेटच्या माध्यमातून माहिती उपलब्ध करुन द्यावी लागेल. यासाठी शासनाची स्वत:ची वेब साईट इंटरनेटवर असणे आवश्यक आहे.

शासनाने आपली अधिकृत वेब साईट ही दिनांक १/५/१९९८ पासून इंटरनेटवर सुरु केलेली असून ही वेब साईट, विकास आयुक्त, उद्योग व महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या संयुक्त विद्यमाने तयार करण्यात आलेली आहे. वेब साईट तयार करणे व होस्ट करणे आणि पुढे ती चालू ठेवणे यासाठी विकास आयुक्त, उद्योग यांनी मे.प्युअरटेक इंडिया लिमिटेड या कंपनीशी दिनांक १/१/१९९८ रोजी कराराही केलेला आहे. या करारान्वये वेब साईटसाठी मजकूर तयार करणे व तो वेब साईटवर होस्ट करणे या कामाकरीता ज्या दराने मोबदला देय आहे ते दरसुध्दा ठरविण्यांत आलेले आहेत. विकास आयुक्त, उद्योग यांनी सदर करार केल्यानंतर शासकीय कामकाजाच्या संगणकीकरणाबाबतचे सर्व निर्णय घेणे व शासकीय कामकाजाच्या संगणकीकरण कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे या कामासाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाची स्थापना करण्यांत आलेली आहे. शासनाच्या वेब साईटवर जी माहिती उपलब्ध करुन द्यावयाची असेल त्याचे स्वरुप अतिशय सर्वसमावेशक असणार असून सर्व विभागांनी विशिष्ट पध्दतीने याबाबतीत कार्यवाही करावयाची आहे. वेगवेगळया विभागाने वेब साईटसाठी त्यांच्या सेवा व माहिती उपलब्ध करुन देणे यासाठी कशाप्रकारे कार्यवाही करावी व अशी कार्यवाही करीत असतांना कोणती पध्दत अनुसरावी याबाबत सर्व समावेशक आदेश निर्गमित होणे आवश्यक होते. तसेच शासनाच्या या वेब साईटचे पूर्ण वेळ व्यवस्थापन करण्यासाठी कोणती यंत्रणा नोडल यंत्रणा म्हणून काम करेल याबाबतही निर्णय घेणे आवश्यक



GR-20020205170408000-0104

होते. या बाबीवर उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समितीच्या बैठकीमध्ये दिनांक २९/७/९९ रोजी सविस्तर चर्चा करण्यांत आली. चर्चेअंती खालीलप्रमाणे निर्णय शासनाने घेतलेला आहे.

**शासन निर्णयः-**

(१) जानेवारी २००० पासून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटचे व्यवस्थापन माहिती तंत्रज्ञान संचालनालयांकडे असेल.

(२) यापुढे या संदर्भातील वेगवेगळे आदेश व सूचना माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून निर्गमित करण्यांत येतील.

(३) शासनाच्या कुठल्याही विभागाने अथवा कार्यालयाने अथवा अधिनस्थ संस्थांनी आपली वेब साईट तयार करीत असतांना त्यासाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालय याबाबत जी कार्यपध्दती ठरवून देईल त्यानुसारच कार्यवाही करावी.

(४) यापुढे शासनाच्या कुठल्याही विभागाने अथवा कार्यालयाने आपली वेब साईट तयार करीत असतांना त्या वेब साईटचा पत्ता माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून प्राप्त करुन घ्यावा. तसेच आतापर्यन्त ज्या कार्यालयांनी / विभागांनी स्वतंत्र वेबसाईटस् विकसित करुन होस्ट केल्या आहेत त्या सर्व वेब साईटसाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून नवीन पत्ता प्राप्त करुन घ्यावा व एकाच डोमेनमध्ये त्यांच्या साईटस् यापुढे असतील यासाठी कार्यवाही करावी.

(५) शासनाचे अंगिकृत व्यवसाय व स्थानिक स्वराज्य संस्था यांनी आपल्या वेब साईटस् तयार करीत असताना त्या महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत वेब साईटशी लिंक करण्याची व्यवस्था करावी. तसेच स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाचे अंगिकृत व्यवसाय यांच्या वेब साईटस् महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत वेब साईटला लिंक असाव्यात.

(६) मेसर्स प्युअरटेक इंडिया लिमिटेड यांच्याबरोबर विकास आयुक्त, उद्योग यांनी केलेला करार हा दिनांक ३०/४/२००० पर्यन्त अस्तित्वात राहील. ज्या विभागांना/ कार्यालयांना / शासनाच्या अंगिकृत व्यवसायांना व स्थानिक स्वराज्य संस्थांना आपल्या वेब साईट विकसित करावयाच्या आहेत अशा संस्था मेसर्स प्युअरटेक इंडिया लिमिटेड यांच्याबरोबर ठरलेल्या करारनाम्यातील दरानुसार दिनांक ३० एप्रिल, २००० पर्यंत काम करु शकतील. प्रत्येक विभागाने याबाबत काम देण्यापूर्वी वित्त विभागाची प्रकरण निहाय मान्यता घ्यावी.

(७) यापुढे विभागांनी त्यांच्या वेबसाईटवरील माहितीच्या व्यवस्थापनासाठी स्वतंत्र अधिकारी नियुक्त करावा व अशा अधिका-यांचे नाव माहिती तंत्रज्ञान संचालनालयास उलट टपाली कळवावे. विभागांनी / कार्यालयांनी यापूर्वी संगणक विषयक कामासाठी अधिकारी नियुक्त केले आहेत त्या अधिका-यांकडे हे काम सोपविता येईल.

GR-20020205170408000-0104

(८) जे विभाग या वेबसाईटसाठी माहिती पुरवितील ती माहिती वेळोवेळी अद्ययावत करण्याची जबाबदारी सर्वस्वी संबंधित विभागांची राहील. तसेच त्या वेब साईटवर कोणाशी संपर्क साधला आहे याकरीता संबंधित अधिका-यांनी दररोज वेबसाईट पाहून त्यावर त्वरीत कार्यवाही करण्याची गरज आहे.

हा शासन निर्णय उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समितीस शासन निर्णय क्रमांक सीओएम-१०९८/प्र.क्र.२१३/९८/३९, दिनांक ११.१२.१९९८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सुरेश कुमार

(सुरेश कुमार)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव
उपमुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
शासनाचे मुख्य सचिव
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/
प्रधान सचिव/ सचिव
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकआयुक्त
यांचे कार्यालय , मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ
सचिवालय (विधानसभा ), मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ
सचिवालय (विधान परिषद ) ,मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र,नागपूर
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा ),महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/
लेखाकोष भवन, वांद्रे (पूर्व ),मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्यकार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील
सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
सामान्य प्रशासन विभागातील(कार्यासन
क्रमांक २५/२६ ),मंत्रालय,मुंबई,
वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय ४ ),
मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (दोन प्रती).

GR-20020205170408000-0104